महाराष्ट्र महानगरपालिका (स्थावर मालमत्ता भाडेपट्टा नुतनीकरण अथवा हस्तांतरण) नियम, २०१९ मधील नियमावलीत सुधारणा करण्याकरीता पुनर्विलोकन समिती गठीत करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**नगर विकास विभाग**
**शासन आदेश क्रमांक- नामपा-१२२१/प्र.क्र.१६६/नवि-२६**
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक :- ०६ एप्रिल, २०२२.

**वाचा :-** महाराष्ट्र शासन राजपत्र असाधारण भाग ४ (ब) दि.१३ सप्टेंबर, २०१९ अन्वये प्रसिध्द महाराष्ट्र महानगरपालिका (स्थावर मालमत्ता भाडेपट्टा नुतनीकरण अथवा हस्तांतरण) नियम, २०१९.

**शासन आदेश :-**

महाराष्ट्र महानगरपालिका (स्थावर मालमत्ता भाडेपट्टा नुतनीकरण व हस्तांतरण) नियम, २०१९ दि.१३.०९.२०१९ रोजी अधिसूचनेद्वारे प्रसिध्द झाली असून या अधिसूचनेतील नियम ३(२) नुसार भाडे निश्चिती बाबत असलेल्या तरतूदीच्या अनुषंगाने अर्थसंकल्पिय अधिवेशन २०२२ मध्ये श्री.देवेंद्र फडणवीस, मा.वि.स.स. यांनी महाराष्ट्र विधानसभा नियम १०५ अनुसार लक्षवेधी सूचना उपस्थित केली.

२. या लक्षवेधीवर सभागृहामध्ये झालेल्या चर्चेदरम्यान विधिमंडळामध्ये दिलेल्या आश्वासनाच्या अनुषंगाने नियमावलीतील नियम ३ (२) मध्ये सुधारणा करुन हस्तांतरण किंवा नुतनीकरण करण्याकरीता प्रयोजननिहाय भाडेपट्टा निश्चिती करण्याकरीता एक समिती गठीत करणे आवश्यक आहे.

३. या अनुषंगाने भूभाटक / भूखंडाचे भाडे निश्चितीकरण **पुनर्विलोकन समिती गठीत करण्यास शासन मान्यत देण्यात येत आहे. या समितीची संरचना** पुढीलप्रमाणे असेल.-

| अ.क्र | समितीचे सदस्य | पदनाम |
|---|---|---|
| १ | प्रधान सचिव (नवि-२), नगर विकास विभाग | अध्यक्ष |
| २ | आयुक्त, नागपूर महानगरपालिका | सदस्य |
| ३ | उप सचिव, (नवि-२५), नगर विकास विभाग | सदस्य |
| ४ | उप सचिव (नवि-१४), नगर विकास विभाग | सदस्य |
| ५ | उप सचिव, विधि व न्याय विभाग | सदस्य |
| ६ | उप सचिव (नवि-२६), नगर विकास विभाग | सदस्य सचिव |

४. **समितीची कार्यकक्षा-** महाराष्ट्र महानगरपालिका (स्थावर मालमत्ता भाडेपट्टा नुतनीकरण व हस्तांतरण) नियम, २०१९ दि.१३.०९.२०१९ च्या अधिसूचनेद्वारे प्रसिद्ध करण्यात आली आहे.

यामधील नियम ३(२) नुसार भाडे निश्चिती बाबत असलेल्या तरतूदी तसेच इतर अनुषंगिक तरतूदींमध्ये सुधारणा करण्याकरिता सर्वसमावेशक विचार करुन सुधारीत धोरण निश्चित करणे.

५. **समितीचा कार्यकाळ-** समितीने गठीत झाल्यापासून १५ कार्यालयीन दिवसांमध्ये समितीने सर्वसमावेशक अहवाल मा.मंत्री (नगर विकास) यांना निर्णयार्थ सादर करावा.

सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून, त्याचा संकेतांक २०२२०४०७१२०४५०९९२५ असा आहे. सदर शासन आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Digitally signed by Vidya Ramappa Hampayya
Date: 2022.04.07 12:11:35 +05'30'

**( विद्या हम्पय्या )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

(१) प्रधान सचिव (नवि-२), नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
(२) प्रधान सचिव, विधि व न्याय विभाग, मंत्रालय, मुंबई.
(३) आयुक्त, नागपूर महानगरपालिका, नागपूर.
(४) उप सचिव, विधि व न्याय विभाग, मंत्रालय, मुंबई.
(५) उप सचिव, (नवि-२५), नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
(६) उप सचिव (नवि-१४), नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.

**प्रत माहितीसाठी-**

(१) मा. मंत्री (नगर विकास) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
(२) मा.विरोधी पक्षनेता यांचे खाजगी सचिव, महाराष्ट्र विधानसभा, विधानभवन, मुंबई.
(३) मा.राज्यमंत्री (नगर विकास) यांचे विशेष कार्य अधिकारी, मंत्रालय, मुंबई.
(४) निवडनस्ती (नवि-२६).